तालुका फळरोपवाटिका, कदिमबाग, जिल्हा नागपूर येथील रोजंदारी मजुरांना वेतनाच्या थकबाकीची रक्कम अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायाप्र-२०१४/प्र.क्र.१७ /१३-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४००० ०३२
दिनांक : ३० मे, २०१५.

**वाचा :-**

१) मा.औद्योगिक न्यायालय,नागपूर यांनी तक्रार अर्ज क्र.३०२/१९९० मध्ये दिनांक २९/०३/२००१ रोजी दिलेले आदेश.

२) मा.उच्च न्यायालय,नागपूर यांनी रिट याचिका क्र.५१४५/२०१४ मध्ये दिनांक ०३/०२/२०१५ रोजी दिलेले आदेश.

३) सहाय्यक सरकारी वकील,मा.उच्च न्यायालय,नागपूर यांचे दिनांक २३/०२/२०१५ रोजीचे अभिप्राय.

४) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.फलो-३/न्यायप्र/२००१/भाग-२/आस्था-३/३३८, दिनांक २७/०३/२०१५

**प्रस्तावना :-**

तालुका फळरोपवाटिका,कदिमबाग नागपूर येथील एकुण ८ रोजंदारी मजूरांनी त्यांना शासन सेवेत कायम करून थकबाकीसह वेतन दयावे,यासाठी मा.औद्योगिक न्यायालयामध्ये तक्रारअर्ज क्र.३०२/१९९०दाखल केला होता. याप्रकरणी मा.औद्योगिक न्यायालयाने तक्रारदारांचा अर्ज अंशत: मंजूर करताना **दिनांक २९/०३/२००१ रोजी** असा निर्णय दिला की,प्रतिवादी अनुचीत कामगार प्रथेचा अवलंब करीत आहेत.यास्तव प्रतिवादी (शासन ) यांनी याचिकाकर्ता क्र.१ व ५ यांना सेवेत कायम करावे व त्यांना देय असलेली थकबाकीची रक्कम अदा करावी.तक्रारदार क्र.२ ते ४ व ६ ते ८ यांचा तक्रारअर्ज निकाली काढण्यात येत आहे.

मा.औद्योगिक न्यायालयाच्या वरील निर्णयाविरुध्द शासनाने मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे रिट याचिका क्र.४४२०/२००२ अन्वये अपिल दाखल केले.दरम्यानच्या कालावधीमध्ये तालुका फळरोपवाटिकेतील अधिका-यांच्या तोंडी आदेशानुसार वरील ८ रोजंदारी मजुरांना कामावरून कमी केले.त्यांने व्यथित होऊन श्रीमती रुखमाबाई थेटे व श्री.किशोर ताकसांडे या रोजंदारी मजुरांनी मा.चौथे कामगार न्यायालय,नागपूर येथे तक्रार अर्ज क्र.१९०/२००२ दाखल केला .त्यावेळी मा.उच्च न्यायालय,नागपूर येथे वरील अपिल प्रलंबित होते.मा.उच्च न्यायालय,नागपूर यांनी सदर अपिल दिनांक **१६/८/२००२ रोजीच्या** आदेशान्वये फेटाळले.

वरील तक्रर अर्ज क्र.१९०/२००२ मध्ये मा.चौथे कामगार न्यायालयाने **दिनांक १२/०५/२००९ रोजी** असा आदेश पारीत केला की, प्रतिवादी हे तोंडी आदेशान्वये संबंधीत कामगारांना सेवेत काढून टाकून अनुचीत कामगार प्रथेचा अवलंब करीत आहेत.तक्रारदांना पूर्वीपासून सेवेत कायम करावे व त्यांना देय असलेली थकबाकीची रक्कम व इतर देय रक्कम अदा करावी.

मा.चौथे कामगार न्यायालय तसेच मा.उच्च न्यायालय,नागपूर यांचे वरील आदेश विचारात घेऊन कृषी विभागाने श्रीमती थेटे यांना रु.३,६३,५७५/- व श्री.ताकसांडे यांना रु.३,६१,०७९/- अशी रक्कम अदा करण्यात आलेली आहे.

तथापि तद्नंतर वरील रकमांच्या परिगणना त्यांना मान्य नसल्यामूळे श्रीमती थेटे व श्री.ताकसांडे यांनी दिनांक २४/१२/२०१० रोजी चतुर्थ कामगार न्यायालय,नागपूर येथे पुन्हा तक्रार अर्ज क्र. ९३/२०१० दाखल केला.त्यात त्यांनी अशी मागणी केली की,त्यांच्या वेतनाची थकबाकी दिनांक १२/४/१९९० पासून परिगणित करावी.जेणेकरून श्रीमती थेटे यांना रु.७,७४,६१०/- व श्री.ताकसांडे यांना रु.७,७७,११०/- अशी वाढीव थकबाकीची रक्कम मिळेल.या प्रकरणी मा.चतुर्थ कामगार न्यायालय,नागपूर यांनी वरील अर्ज अंशत: मंजूर करताना दिनांक ५/१०/२०१२ रोजी असा निर्णय दिला की,प्रतिवादी (शासन) यांनी सदर आदेश निर्गमीत झाल्यापासून दोन महीन्यांच्या आत तक्रारदार क्र.१ (श्रीमती रुखमाबाई तुकारात थेटे) यांना रु.७,७४,६१०/- व तक्रारदार क्र.२ (श्री.किशोर सदाशिव ताकसांडे) यांना रु.७,७७,११०/- अशी वेतनाची थकबाकी अदा करण्यात यावी.मात्र तक्रारदारांची व्याजाच्या रकमेची मागणी नामंजूर करण्यात येत आहे.

तथापि उपलब्ध कागदपत्रांच्या आधारे जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,नागपूर यांच्या कार्यालयाने वरील थकबाकी रु.७,७४,६१०/- ऐवजी रु.५,३८,०५४/- व रु.७,७७,११०/- ऐवजी रु.५,२३,१८२/- अशी परिगणना केली.व त्यानुसार शासनाने मा.चतुर्थ कामगार न्यायालय,नागपूर यांच्या वरील दिनांक ५/१०/२०१२ रोजीच्या आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय,नागपूर यांच्याकडे रिट याचिका क्र.५१४५/२०१४ अन्वये अपिल दाखल केले.सदर अपिलावर मा.उच्च न्यायालय,नागपूर यांनी दिनांक ३/२/२०१५ रोजी तोंडी आदेश दिले की, प्रतिवादी क्र.१ (श्रीमती रुखमाबाई तुकाराम थेटे )यांना रु.५,३८,०५४/- व प्रतिवादी क्र.२ (श्री.किशोर ताकसांडे )यांना रु.५,२३,१८२/- अशी रक्कम अदा करावी. मा.उच्च न्यायालयाचे वरील आदेशास आव्हान देण्याइतपत कोणतीही ठोस बाजू नसल्यामूळे सदर आदेशास वरिष्ठ न्यायालयामध्ये आव्हान देणे संयुक्तिक होणार नाही,असे अभिप्राय सहाय्यक सरकारी वकील,मा.उच्च न्यायालय,नागपूर यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये दिलेले आहेत.

वरील परिच्छेदांमध्ये नमूद केलेल्या सर्व बाबी विचारात घेऊन तालुका फळरोपवाटिका, कदिमबाग, जिल्हा नागपूर येथील श्रीमती रुखमाबाई थेटे व श्री.किशोर ताकसांडे या रोजंदारी मजुरांना वेतनाच्या थकबाकीची रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तुत प्रकरणी मा.उच्च न्यायालय,नागपूर यांच्याकडे रिट याचिका क्र.५१४५/२०१४ अन्वये दाखल करण्यात आलेल्या अपिलासंदर्भात जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,नागपूर यांनी परिगणित केल्यानूसार व मा.उच्च न्यायालयाने दिनांक ३/२/२०१५ रोजी दिलेल्या आदेशानुसार तालुका फळरोपवाटिका, कदिमबाग, जिल्हा नागपूर येथील रोजंदारी मजूर श्रीमती रुखमाबाई तुकारामथेटे यांना रु.५,३८,०५४/- व श्री.किशोर ताकसांडे यांना रु.५,२३,१८२/- एवढया वेतनाच्या थकबाकीची रक्कम अदा करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.तथापि मा.औद्योगिक न्यायालय,नागपूर यांनी युएलपी क्र.३०२/१९९० मध्ये दिनांक २९/०३/२००१ मध्ये दिलेल्या आदेशानुसार श्रीमती रुखमाबाई थेटे व श्री.किशोर ताकसांडे यांना यापूर्वी अदा करण्यात आलेली अनुक्रमे रु.३,६३,५७५/- व रु.३,६१,०७९/- एवढया रकमा उपरोक्त सुधारीत परिगणित करण्यात आलेल्या रकमांतून समायोजीत करण्यात याव्यात.

२. प्रस्तुत प्रकरणी वेतनाच्या थकबाकीची परिगणना अचुक असल्याची खातरजमा जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,नागपूर यांनी करावी.या प्रकरणी मा.उच्च न्यायालय,नागपूर यांनी दिनांक ०३/०२/२०१५ रोजी आदेश पारीत केले असताना यासंदर्भातील प्रस्ताव आयुक्तालयातर्फे दिनांक २७/०३/२०१५ रोजी शासनास सादर करण्यात आला.तरी या विलंबास जबाबदार असणा-या अधिका-यावर जबाबदारी निश्चित करून त्यानुसार शासनास तातडीने अहवाल सादर करावा.

३. प्रस्तुत निधी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर असलेल्या निधीतून खालील लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

मागणी क्र.डी-२,

२४०१-पिक संवर्धन

१९९-बागायती व भाजीपाला पिके,

१९९(०३) रोपमळे

(०१)(११)भाजीपाला रोपमळे

२४०१-१७२२/०२

४. प्रस्तुतचा शासन निर्णय,वित्त विभागाच्या मान्यतेने ,त्यांच्या अनौपचारीक संदर्भ ,दिनांक १२/०५/२०१५ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०४१५५९०७०८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAKHARKAR AMOL NILKANTH

Digitally signed by SAKHARKAR AMOL NILKANTH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AAHDDF,CID - 920025, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAKHARKAR AMOL NILKANTH
Date: 2015.06.11 14:02:55 +05'30'

(अ.नि.साखरकर)
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

सहसंचालक (आस्थापना),महाराष्ट्र राज्य,पुणे.

**प्रत,**

१) मा. अपर मुख्य सचिव (कृषी) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२) महालेखापाल-१ (लेखा व अनज्ञेयता)लेखा परीक्षा ,मुंबई.

३) उप सचिव (फलोत्पादन) यांचे स्वीय सहाय्यक,कृषी व पदुम विभाग, मंत्रालय , मुंबई-३२.

४) संचालक (फलोत्पादन), महाराष्ट्र राज्य, पुणे.

५) विभागीय कृषी सह संचालक ,नागपूर विभाग.

६) जिल्हा कोषागार अधिकारी,नागपूर.

७) निवडनस्ती -१३अे कार्यासन.